तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांची बदलीने पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२४/प्र.क्र.१३०/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७.०८.२०२४

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) भारत निवडणूक आयोगाचे क्र.२३/२०२४-ERS (Vol-II), दि.२६.०६.२०२४
४) भारत निवडणूक आयोगाचे क्र.४३७/६/१/INST/ECI/FUNCT/MCC/२०२४, (Vol-II), दि.३१.०७.२०२४

**शासन आदेश:-**

भारत निवडणूक आयोगाने संदर्भाधीन क्र. ३ व ४ येथील पत्रान्वये विहित केलेल्या तरतुदी व महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार खाली नमूद केलेल्या अधिकारी यांची स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. राजेश वैष्णव | तहसिलदार (संगायो) जि.का. यवतमाळ | **तहसिलदार तथा करमणूक कर अधिकारी या श्री. किशोर मराठे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर** |
| २. | श्री. गोविंद वाकडे | तहसिलदार धामणगाव रेल्वे जि.अमरावती | **तहसिलदार (रजा राखीव) जि.का. रत्नागिरी या रिक्त पदावर** |

२. **उपरोक्त नमुद अधिकारी यांना पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. उक्त अधिकारी यांच्या बदलीमुळे विधानसभा निवडणूकीकरीता अधिसूचित असलेले सहायक मतदार नोंदणी अधिकारी हे पद रिक्त राहत असल्यास, अशा ठिकाणी अन्य अधिकारी यांची पर्यायी तात्पुरती व्यवस्था करून, कोणत्याही परिस्थितीत सदर पद रिक्त राहणार नाही, याची कटाक्षाने दक्षता घ्यावी.**

उपरोक्त अधिका-यांना कार्यमुक्त करण्यात आल्याचा दिनांक तसेच नवीन नियुक्तीच्या जागी हजर झाल्याचा दिनांक याबाबत e३.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

३. श्री. किशोर मराठे, तहसिलदार यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. सदर अधिका-यांनी शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग दि.०१.१२.२०२३ अन्वये पुढील आदेशापर्यंत संबंधित विभागीय आयुक्तांकडे रुजू व्हावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये उक्त तरतुदीनुसार पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचविरुध्द लोकप्रतिनिधीत्व अधिनियम १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"** *(dies non)* **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०८०७१७४८३३०६१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2024.08.07 18:03:43 +05'30'

**(अजित देशमुख)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

- सर्व विभागीय आयुक्त

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).